“विरमाता जिजाबाई टेक्नॉलॉजी इन्स्टिट्यूट, मुंबई या संस्थेमध्ये Incubation Centre स्थापना करणेबाबत”

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-१११११/(१२४/१७)/ तांशि-२**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
मुंबई-४०० ०३२
दिनांक : २५ ऑक्टोबर, २०१८

संदर्भ :-

१) अध्यक्ष, नियामक मंडळ, वीरमाता जिजाबाई टेक्नॉलॉजी इन्स्टिटयूट, मुंबई यांचे क्रमांक DIR./DST/NIDHI./Committee/१२०१/१७, दिनांक २६ मे, २०१७ चे पत्र.
२) संचालक, वीरमाता जिजाबाई टेक्नॉलॉजी इन्स्टिटयूट, मुंबई यांचे क्रमांक Dir.Desk/NIDHI / Incub.centre/४१४९/२०१७-१८, दिनांक २५/९/२०१७ रोजीचे पत्र.
३) संचालक, वीरमाता जिजाबाई टेक्नॉलॉजी इन्स्टिटयूट, मुंबई यांचे क्रमांक VJTI/ TBI/ ४३९०/२०१८, दिनांक ८/१०/२०१८ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :**

विज्ञान व तंत्रज्ञान विभाग (DST), भारत सरकार यांनी सन २०१६ मध्ये कल्पना आणि नवकल्पना (ज्ञान-आधारित आणि तंत्रज्ञानावर आधारित) यांचा विकास करण्यासाठी “निधी NIDHI (National Initiative for Development and Harnessing Innovations)” हा एकछत्री कार्यक्रम सुरू केलेला आहे. सदर कार्यक्रमाद्वारे युवकांना दिशा दाखवून आणि देशाच्या सामाजिक-आर्थिक विकासावर सकारात्मक परिणाम घडवून आणण्यासाठी, नावीन्यपूर्ण उद्योजकता पूरक पर्यावरण तयार करण्यावर लक्ष केंद्रित करण्यात येणार असून कार्यक्रमाचा उद्देश केवळ समाजाच्या मागणीनुसार आवश्यक तांत्रिक समाधानाची तरतूद करणे हा आहे. तसेच आर्थिक वृद्धी आणि नोकरीच्या निर्मितीसाठी नवीन मार्ग तयार करणे हे देखील लक्ष्य आहे. मा. पंतप्रधानांच्या स्टार्टअप इंडिया या महत्वाकांक्षी योजनेच्या पुर्ततेसाठी आणि देशातील स्टार्टअप इकोसिस्टम मध्ये वेग आणि गुणवत्ता आणण्याचे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी विज्ञान व तंत्रज्ञान विभागाद्वारे (DST) पुढील काही वर्षात या नवीन कार्यक्रमांचे अंमलबजावणीद्वारे रु. ५०० कोटी खर्च केले जाणार आहेत. आतापर्यंत, विज्ञान व तंत्रज्ञान विभागाने शैक्षणिक आणि संशोधन क्षेत्रातील १०० पेक्षा अधिक तंत्रज्ञानाच्या व्यावसायिक इन्क्यूबेटरची स्थापना केली आहे. या संस्थांमध्ये आयआयटी, आयआयएम, एनआयटी आणि अन्य शैक्षणीक संस्था समाविष्ट आहेत. या इनक्यूबेटरचे प्रत्येक तंत्रज्ञान डोमेनवर केंद्रित आहे आणि हे सर्व एकत्रितपणे २००० पेक्षा अधिक स्टार्टअप्स एकत्र करतात आणि सुमारे ७ लाख चौरस फुटाचे क्षेत्र स्टार्टअप साठी उपलब्ध करून देतात. विज्ञान व तंत्रज्ञान विभागाने निवड केलेल्या संस्थांमध्ये राज्यातील विरमाता जिजाबाई टेक्नॉलॉजी इन्स्टिटयूट, मुंबई या राज्य शासनाच्या स्वायत्त संस्थेचा समावेश करण्यात आला असल्याचे अध्यक्ष, नियामक मंडळ, विरमाता जिजाबाई टेक्नॉलॉजी इन्स्टिटयूट, मुंबई यांनी त्यांच्या संदर्भ क्रमांक १ येथे नमूद दिनांक २६ मे, २०१७ रोजीच्या पत्रान्वये कळविलेले आहे. तसेच, सदर कार्यक्रमांतर्गत संस्थेमध्ये INCUBATION CENTRE स्थापन करण्यासाठी NIDHI (National Initiative for Development and Harnessing Innovations), केंद्र

शासनाच्या विज्ञान व तंत्रज्ञान विभागाद्वारे रु. ८.०० कोटी इतका निधी प्राप्त होण्याकरीता Not-for-profit या तत्वावरील VJTI-TBI ट्रस्टची स्थापना करणे व विरमाता जिजाबाई टेक्नॉलॉजी इन्स्टिट्यूट, मुंबई या संस्थेतील २०,००० चौ.फुट (built up) जागा VJTI-TBI (Veermata Jijabai Technological Institute- Technology Business Incubator) ट्रस्टला ३० वर्षाच्या भाडेपट्टीवर Incubation Centre करीता देण्याची कार्यवाही होणे आवश्यक असल्याचे संदर्भ क्रमांक १ येथील पत्रान्वये शासनास अवगत केले आहे.

या प्रकरणी VJTI-TBI ट्रस्टची स्थापना करणे व या ट्रस्टला जागा भाडेतत्वावर देण्याकरीता नियामक मंडळ, विरमाता जिजाबाई टेक्नॉलॉजी इन्स्टिट्यूट, मुंबई यांनी दिनांक ८/९/२०१७ रोजी झालेल्या बैठकीमध्ये मान्यता दिलेली असल्याचे शासनास कळविलेले आहे.

तसेच प्रस्तुत प्रकरणी स्थापन करावयाच्या ट्रस्ट डीडचा मसुदा संदर्भ क्रमांक २ येथील पत्रान्वये संचालक, विरमाता जिजाबाई टेक्नॉलॉजी इन्स्टिट्यूट, मुंबई यांनी मान्यतेस्तव शासनास सादर केलेला आहे.

त्याअनुषंगाने, विरमाता जिजाबाई टेक्नॉलॉजी इन्स्टिट्यूट, मुंबई या संस्थेमध्ये Incubation Centre स्थापन करणे, केंद्र शासनाच्या विज्ञान व तंत्रज्ञान विभागाद्वारे रु. ८.०० कोटी इतका निधी प्राप्त होण्याकरीता Not-for-profit या तत्वावरील VJTI-TBI ट्रस्टची स्थापना करणे व विरमाता जिजाबाई टेक्नॉलॉजी इन्स्टिट्यूट, मुंबई या संस्थेतील २०,००० चौ.फुट (built up) जागा VJTI-TBI ट्रस्टला Incubation Centre करीता ३० वर्षाच्या भाडेपट्टीवर देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :**

विज्ञान व तंत्रज्ञान विभाग (DST), भारत सरकार यांच्या "निधी NIDHI (National Initiative for Development and Harnessing Innovations)" हा एकछत्री कार्यक्रमांतर्गत विरमाता जिजाबाई टेक्नॉलॉजी इन्स्टिट्यूट, मुंबई या संस्थेमध्ये INCUBATION CENTRE स्थापन करण्यास आणि केंद्र शासनाच्या विज्ञान व तंत्रज्ञान विभागाद्वारे रु. ८.०० कोटी इतका निधी प्राप्त होण्याकरीता Not-for-profit या तत्वावरील VJTI-TBI ट्रस्टची स्थापना करणे व विरमाता जिजाबाई टेक्नॉलॉजी इन्स्टिट्यूट, मुंबई या संस्थेतील २०,००० चौ.फुट (built up) जागा VJTI-TBI ट्रस्टला ३० वर्षाच्या भाडेपट्टीवर Incubation Centre करीता देण्याकरीता खालील नमूद अटींच्या अधिन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

अ) संस्थेने संदर्भ क्रमांक २ येथील पत्रान्वये शासनास सादर केलेल्या ट्रस्ट डीडच्या मसुद्यातील अ.क्र.१३ मध्ये First Board of Trustees of the trust मध्ये शासनाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव(उ. व तं.शि.)/उपसचिव (तं.शि.) आणि संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई हे कायम सदस्य असतील, अशी सुधारणा करण्यात यावी. सुधारीत ट्रस्ट डीडची एक प्रत शासनास सादर करावी.

आ) शासनाने विरमाता जिजाबाई टेक्नॉलॉजी इन्स्टिट्यूट, मुंबई या संस्थेच्या नियामक मंडळावर शासन निर्णयान्वये वेळोवेळी नियुक्त केलेले अध्यक्ष व शासन नियुक्त सदस्य यांचा शासन निर्णयान्वये विहित केलेला कालावधी इतकाच कालावधी VJTI-TBI ट्रस्ट मध्ये राहिल, अशी सुधारणा करावी, सदरचे सर्व सदस्य हे पदसिध्द सदस्य असतील.

इ) विरमाता जिजाबाई टेक्नॉलॉजी इन्स्टिट्यूट, मुंबई ही शासनाच्या मालकीची संस्था असल्याने या प्रकरणी ट्रस्ट करीता दिलेल्या जागेची मालकी हि शासनाची राहिल व त्याच्या विल्हेवाटीचेही अधिकार शासनाचेच राहतील अशी ट्रस्ट डीडच्या मसुद्यातील अ.क्र. २७ येथे सुधारणा करण्यात यावी. सदरच्या ट्रस्ट VJTI संस्थेकडे सदरची मालमत्ता हस्तांतरीत करेल.

ई) या प्रकरणी संस्थेच्या सर्व मालमत्तेच्या मालकीबाबतची संपुर्ण अद्यायावत कायदेशीर माहिती (जसे मालमत्ता कार्ड,महानगर पालिका कर, नगर भुमापनाचे आदेश) शासनास सादर करावी.

उ) VJTI-TBI ट्रस्टला २०,००० चौ.फुट जागा देतांना जागेच्या मालकीच्या सर्व बाबी (तांत्रिक बाबी सहित) विचारात घेऊन कार्यवाही करावी.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२६१२५८३३५२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash Bhaskarrao Avhad

Digitally signed by Prakash Bhaskarrao Avhad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e09e7338f45626229cb6381e8154da93814d3127e9859a46e544f505defcd004, cn=Prakash Bhaskarrao Avhad
Date: 2018.10.26 13:04:16 +05'30'

**( प्रकाश आव्हाड )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे विशेष कार्य अधिकारी
३. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे विशेष कार्य अधिकारी
४. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-०१
५. सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, मुंबई.
६. संचालक, विरमाता जिजाबाई टेक्नॉलॉजी इन्स्टिट्यूट, एच. आर. महाजनी मार्ग, माटुंगा, मुंबई ४०० ०१९
७. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
८. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपुर,
९. महालेखापाल (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,
१०. महालेखापाल (लेखा परिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर,
११. संचालक, लेखा व कोषागारे,
१२. अभिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१३. सर्व कार्यासने, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१४. निवड नस्ती (तांशि-२).